**प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत- PMJVK ( पुर्वीचा बहु क्षेत्र विकास कार्यक्रम-MsDP ) कळमनुरी जि. हिंगोली येथील ०१ मुलांच्या वसतीगृह इमारतीच्या बांधकामाकरीता राज्य हिश्यांतर्गत समर्पित निधी पुनश्च वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अविवि-२०१२ /प्र.क्र.१३७ (भाग-२) /का.०७,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२
दिनांक: - ०३ /०७/२०२०

**संदर्भ:**
१. अवर सचिव,अल्पसंख्याक कार्य मंत्रालय,भारत सरकार यांचे पत्र क्र.३/१३(३)/२००८-PP-I दि.१९/०२/२०१३.
२. शासन निर्णय,अल्पसंख्याक विकास विभाग,क्र.अविवि-२०१२/प्र.क्र.१३७/का.७,दि.२८/०३/ २०१३ व दि. २९/०३/२०१३.
३. शासन ज्ञापन, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अविवि-२०१२/ प्र.क्र.१३७ (भाग-१) / का.७, दि. १४/०९/२०१५.
४. शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अविवि-२०१२/ प्र.क्र.१३७ (भाग-१) / का.७, दि. ४/११/२०१५.
५. शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अविवि-२०१३/ प्र.क्र.१३७ (भाग-१) / का.७, दि. ०६/०५/२०१६.
६. शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अविवि-२०१२/ प्र.क्र.१३७ (भाग-२) / का.७, दि. १९/०९/२०१८.
७. जिल्हाधिकारी,हिंगोली यांचे पत्र क्र.जिनिस/अल्प.वसतीगृह/२०१९-२०/१५३७ दि.०३/१२/ २०१९.
८. शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अविवि-२०१२/ प्र.क्र.१३७ (भाग-२) / का.७, दि. २१/१२/२०१९.
९. जिल्हाधिकारी,हिंगोली यांचे पत्र क्र.जिनिसहिं/अल्प.वसती/लेखा/अर्थ/२०१९-२०/५९६ दि.३१/०३/ २०२०.

**प्रस्तावना :-**

१२ व्या पंचवार्षिक योजनेत केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत - PMJVK ( पुर्वीचा बहुक्षेत्र विकास कार्यक्रम-MsDP ) गठित शक्ति प्रदान समितीने दि १३/१२/२०१२ रोजीच्या ६२ व्या बैठकीत हिंगोली जिल्ह्यातील हिंगोली शहर व कळमनुरी येथे मुला-मुलींसाठी १०० प्रवेश क्षमतेचे प्रत्येकी ०१ याप्रमाणे एकूण ०२ वसतीगृह इमारत बांधकामाच्या एकूण रु.६२०.०० लाख इतक्या इतक्या रकमेच्या प्रस्तावास मान्यता दिली आहे. संदर्भ क्र. (३) येथील ज्ञापनान्वये हिंगोली जिल्ह्यातील कळमनुरी येथे मुलांच्या ०१ वसतीगृह इमारत बांधकामासाठी रु.४३३.४४/-लाख इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.दि.२८/०३/२०१३, दि.१४/०९/२०१५, दि.४/११/२०१५, दि.०६/०५/२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये हिंगोली जिल्ह्यातील कळमनुरी येथे मुलांच्या ०१ वसतीगृह इमारत बांधकामासाठी केंद्र शासन व राज्य शासनाच्या पहिल्या व दुसऱ्या हिश्श्यातील एकूण रू.३१०.०० लक्ष इतकी रक्कम जिल्हाधिकारी, हिंगोली यांना मंजूर करुन वितरित करण्यात आली आहे.सदर मुलांच्या वसतीगृह इमारत बांधकामासाठी केंद्र + राज्य हिश्श्याचे प्रमाण ५० : ५० आहे. संदर्भ क्र. (६) अन्वये वसतीगृह इमारत बांधकामाच्या प्रशासकीय मान्यतेनुसार उर्वरित राज्य हिश्श्यातील रु.१२३.४४ लाख इतका निधी जिल्हाधिकारी, हिंगोली यांना मंजूर करुन वितरित करण्यात आला होता. परंतु सन २०१८-१९ या कालावधीत मंजूर करण्यात

आलेल्या राज्य हिश्यातील रक्कम रु.९७.०४/- लाख इतका निधी विहित कालावधीत खर्च होणार नसल्यामुळे जिल्हाधिकारी, हिंगोली यांनी शासनास प्रत्यार्पित केला आहे. जिल्हाधिकरी हिंगोली यांनी रू.९७.०४ लक्ष इतका समर्पित केलेला निधी संदर्भ क्र. (८) अन्वये सन २०१९-२० या वर्षात जिल्हाधिकारी,हिंगोली यांना वितरीत करण्यात आला होता. सन २०१९-२० या आर्थिक वर्षात वितरीत करण्यात आलेल्या राज्य हिश्श्यातील रू.९७.०४ लाख निधीपैकी रू.४०.२६ लाख निधी खर्च करण्यात आला असून उर्वरीत रक्कम रु.५६.७८/- लाख इतका निधी विहित कालावधीत खर्च होणार नसल्याने जिल्हाधिकारी, हिंगोली यांनी दि.३१/०३/२०२० रोजी शासनास समर्पित केला आहे.सदर निधी पुनश्च: मंजूर करून वितरीत करण्याची संदर्भ क्र. (९) अन्वये जिल्हाधिकारी, हिंगोली यांनी विनंती केली आहे.

जिल्हाधिकारी हिंगोली यांच्या संदर्भ क्र. (९) येथील पत्रातील विनंतीस अनुसरुन, सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील मंजूर निधीतून हिंगोली जिल्ह्यातील कळमनुरी येथे मुलांच्या ०१ वसतीगृह इमारत बांधकामासाठी रु.५६.७८/- लाख इतका निधी जिल्हाधिकारी,हिंगोली यांना मंजूर करुन वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत - PMJVK ( पुर्वीचा बहुक्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत-MsDP ) राज्य हिश्यातील उर्वरित रु.५६.७८ लाख इतका निधी हिंगोली जिल्ह्यातील कळमनुरी येथे मुलांच्या ०१ वसतीगृह इमारतीच्या बांधकामाकरीता जिल्हाधिकारी,हिंगोली यांना खालील तक्त्यातील स्तंभ क्र. (१०) प्रमाणे मंजूर करुन वितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे :-

( रू.लाखांत)

| कामाचे नाव | प्रकल्प किंमत | प्रशासकीय मान्यता | वितरीत पहिला व दुसरा हप्ता | | सन २०१८-१९ मध्ये | | २०१९-२० मध्ये | | सन २०२०-२१ मध्ये वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | केंद्र | राज्य | वितरीत राज्य हिस्सा | शासनास समर्पित निधी | वितरीत राज्य हिस्सा | शासनास समर्पित निधी | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| कळमनुरी जि.हिंगोली येथील अल्पसंख्याक १०० मुलांसाठी वसतीगृह इमारत बांधणे | ३१०.०० | ४३३.४४ | १५५.०० | १५५.०० | १२३.४४ | ९७.०४ | ९७.०४ | ५६.७८ | ५६.७८ |
| **एकूण** | **३१०.००** | **४३३.४४** | **१५५.००** | **१५५.००** | **१२३.४४** | **९७.०४** | **९७.०४** | **५६.७८** | **५६.७८** |

४. उपरोक्त तक्त्यातील स्तंभ क्र.(१०) प्रमाणे सन २०२०-२१ या वर्षात प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत - PMJVK ( पुर्वीचा बहुक्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत-MsDP ) हिंगोली जिल्ह्यातील कळमनुरी येथे मुलांच्या ०१ वसतीगृह इमारत बांधकामासाठी रु.५६.७८ लाख ( रुपये छप्पन लाख अठ्याहत्तर हजार मात्र) इतका निधी जिल्हाधिकारी, हिंगोली यांना सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.

५. सन २०२०-२१ या वर्षात जिल्हाधिकारी, हिंगोली यांना उपरोक्त तक्त्यातील स्तंभ क्र.(१०) प्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या एकूण रकमेच्या मर्यादेत अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून सदर रक्कम आहरित व संवितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.जिल्हाधिकारी, हिंगोली यांनी प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत - PMJVK ( पुर्वीचा बहुक्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत-MsDP ) अल्पसंख्याक

समाजातील १०० प्रवेश क्षमतेच्या मुलांच्या वसतीगृह इमारत बांधकामासाठी आहरित केलेली रक्कम संबंधित अमंलबजावणी यंत्रणेस रितसर वितरित करावी.

६. केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या दि.१६/०२/२०१५ रोजीच्या पत्रातील सूचनांनुसार बहुक्षेत्रिय विकास कार्यक्रमाअंतर्गत (MsDP) वितरीत करण्यात येणा-या निधीस VAT वा कोणत्याही प्रकारचे विभागीय कर लागू राहणार नाहीत.

७. सदरचा खर्च करण्यास वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत C.V.C च्या मार्गदर्शक तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार कोणताही शासन निर्णय / अटी व शर्तीचा भंग होणार नाही, याची दक्षता संबंधित जिल्हाधिकारी यांनी घ्यावी. सदर रक्कम वितरित करण्यापूर्वी संबंधित जिल्हाधिकारी यानी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / कार्यालयीन आदेश / वित्तीय नियमावली / सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्यनियमावली / भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांचे निरिक्षण अहवाल / वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा. तसेच सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील. सदर निधी कोणत्याही संस्थेत ठेव स्वरुपात जमा करता येणार नाही.

८. अमंलबजावणी यंत्रणा यांनी ०१ वसतीगृह बांधकामासाठी राज्य शासनाकडून प्राप्त झालेल्या निधीच्या विनियोगाबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे तसेच त्रैमासिक अहवाल (QPR) विहित नमुन्यात (अद्ययावत छायाचित्रांसह) संबंधीत जिल्हाधिकारी यांच्यामार्फत शासनास सादर करावी. तसेच विभागाच्या Construction tracker प्रणालीवर देखील सदर वसतीगृह बांधकामाची माहिती वेळोवेळी upload करावी.

१०. सदर योजनेंतर्गत राज्य हिश्श्यावर होणारा खर्च "मागणी क्र.झेड ई-१, मुख्यलेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (०१) (१४) अल्पसंख्याक बहुल क्षेत्रासाठी बहुक्षेत्रीय विकास योजना, ( राज्य हिस्सा) कार्यक्र (२२३५-ए २३१ ) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

११. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि.१६/०४/२०२० अन्वये प्रशासनिक विभागांस प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२००७०३१२३८२३१३१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh M. Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, serialNumber=6adb2bdbbd3bd651a8ade806b6e4aea66daa5512ea788889af1515751abc0181, cn=Dinesh M. Sonavane Date: 2020.07.03 13:35:31 +05'30'

**( दि.मा.सोनवणे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१.प्रधान सचिव,शालेय शिक्षण विभाग,मंत्रालय,मुंबई.
२.प्रधान सचिव,महिला बाल विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
३.विभागीय आयुक्त,औरंगाबाद
४.सचिव,सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई.
५. मा.मंत्री/ मा.राज्यमंत्री यांचे खासगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
६. जिल्हाधिकारी,हिंगोली
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, हिंगोली
८.महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.

९.महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व परीक्षा) मुंबई/नागपूर.
१०.मुख्य अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ, औरंगाबाद
११.अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड
१२.कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, हिंगोली
१३.संचालक, अल्पसंख्यांक व प्रौढ शिक्षण संचालनालय,पुणे.
१४.जिल्हा कोषागार अधिकारी, जि. हिंगोली
१५.वित्त विभाग (अर्थसंकल्प -४/ व्यय -४) मंत्रालय, मुंबई.
१६.नियोजन विभाग (कार्या.१४७५) मंत्रालय, मुंबई.
१७.निवडनस्ती,(का.७)